विभागीय जिल्हा व तहसिल स्तरावर भ्रष्टाचार निर्मूलन समित्या.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,

शासन परिपत्रक क्रमांकः- सीडीआर-1096/प्र.क्र.20/96/11,

मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 13 डिसेंबर, 1996

## परिपत्रक

शासन यंत्रणेतील भ्रष्टाचाराचे समूळ निर्मूलन करण्याचे धोरण राबविण्यासाठी शासन सतत प्रयत्नशील आहे. त्याचाच एक भाग म्हणून विभागीय आयुक्त यांचे स्तरावर भ्रष्टाचार निर्मूलन समिती स्थापन करण्याबाबत शासनाने नुकताच निर्णय घेतला आहे. या समितीकडे शासकीय कर्मचा-यांविरुध्द येणा-या तक्रारींबाबत पाठपुरावा करण्याचे काम राहिल. या समितीत खालीलप्रमाणे सदस्य असतील :-

| | |
|---|---|
| 1) विभागीय आयुक्त | अध्यक्ष |
| 2) पोलिस उप महानिरीक्षक/पोलिस आयुक्त | सदस्य |
| 3) मुख्य अभियंता, पाटबंधारे विभाग | सदस्य |
| 4) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग | सदस्य |
| 5) अधीक्षक, कृषि अधिकारी | सदस्य |
| 6) मुख्य वनसंरक्षक | सदस्य |
| 7) सहनिबंधक, सहकारी संस्था | सदस्य |
| (*) 8) पाच अशासकीय व्यक्ती | सदस्य |
| 9) उप आयुक्त (महसूल) | सदस्य-सचिव |

(*) (शासनाने दर दोन वर्षांने नामनिर्देशित केलेले)

2. तसेच शासन परिपत्रक क्रमांकः जतनि-1086/प्र.36/18-अ, दिनांक 21 नोव्हेंबर, 1986 अन्वये स्थापन केलेल्या जिल्हा व तालुका स्तरावरील तक्रार निवारण समित्या रद्द करण्यात आल्या असून जिल्हा स्तरीय भ्रष्टाचार निर्मूलन समिती व तालुका स्तरीय भ्रष्टाचार निर्मूलन समिती प्रस्थापित करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. या समितीत खालीलप्रमाणे सदस्य असतील :-

### जिल्हास्तरीय भ्रष्टाचार निर्मूलन समिती

| | |
|---|---|
| 1) जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| 2) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| 3) पोलिस अधीक्षक | सदस्य |
| 4) अधीक्षक/कार्यकारी अभियंता, पाटबंधारे विभाग | सदस्य |
| 5) अधीक्षक/कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग | सदस्य |
| 6) विभागीय मृद संधारण अधिकारी | सदस्य |
| 7) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था | सदस्य |
| 8) निवासी उपजिल्हाधिकारी | सदस्य-सचिव |
| (*) 9) पाच अशासकीय व्यक्ती | सदस्य |

(*) (शासनाने दर दोन वर्षांने नामनिर्देशित केलेले)

### तालुकास्तरीय भ्रष्टाचार निर्मूलन समिती

| | |
|---|---|
| 1) तहसिलचे प्रभारी सहाय्यक किंवा उपजिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| 2) पोलिस उपअधीक्षक | सदस्य |
| 3) उप अभियंता, पाटबंधारे विभाग | सदस्य |
| 4) उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग | सदस्य |
| 5) उप विभागीय मृद संधारण अधिकारी | सदस्य |
| 6) सहाय्यक/उपनिबंधक, सहकारी संस्था | सदस्य |
| 7) गटविकास अधिकारी | सदस्य |
| 8) तहसिलदार | सदस्य-सचिव |
| (*) 9) पाच अशासकीय व्यक्ती | सदस्य |

(*) (शासनाने दर दोन वर्षांने नामनिर्देशित केलेले)

रोटा/एच-1033(6,000-12-96)

(कृ.मा.प.)

या समित्यांची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

(1) विलंब, गैरव्यवहार, अकार्यक्षमता व इतर कारणाने होणा-या भ्रष्टाचाराबाबतच्या तक्रारींची/गा-हाण्यांची दखल घेणे म्हणजेच आलेल्या विशिष्ट अभिकथनाबाबत स्वतंत्रपणे प्राथमिक चौकशी करण्याच्यादृष्टीने तजवीज करणे.

(2) महिन्यातून एकदा म्हणजे महिन्यात आलेलया तक्रारींचे व त्यावर केलेल्या उपाययोजनांबाबतचा आढावा घेऊन प्रलंबित प्रकरणांवर सत्वर कार्यवाही होईल याबद्दल मार्गदर्शन करणे.

(3) भ्रष्टाचार कोणत्या क्षेत्रात/ठिकाणी घडत आहे याबद्दल माहिती घेणे त्या क्षेत्रातील किंवा ठिकाणी भ्रष्टाचार निर्मूलनासाठी उपाययोजना सुचविणे.

(4) प्रशासकीय कार्यपध्दती, नियम व इतर शासकीय व्यवस्थेमध्ये भ्रष्टाचारास वाव राहू नये व त्यांचे निर्मूलन व्हावे यादृष्टीने सुलभता व पारदर्शकता आणण्याबाबत शिफारस करणे. जेणेकरुन सामान्य जनतेला प्रशासकीय कार्यपध्दतीबद्दल साशंकता वाटणार नाही, व त्यांची कामे सहजगत्या कशी होऊ शकतील याबाबत सूचना करणे.

या समित्यांनी आपले काम करताना त्यांच्या मुख्यालयाच्या ठिकाणी जनतेच्या तक्रारी किंवा अभिकथने ऐकून घेण्यासाठी महिन्यातून कमीत कमी एक दिवस राखून ठेवावा. यास पूर्वप्रसिध्दी देऊन समितीने आपल्या मुख्यालयाच्या ठिकाणी म्हणजे विभागीय समितीने विभागीय मुख्यालय, जिल्हा समितीने जिल्हा मुख्यालय व तालुका समितीने तालुका मुख्यालयाचे ठिकाणी जनतेच्या तक्रारी/गा-हाणी ऐकून त्या स्वीकाराव्यात. याबद्दल करावयाच्या कार्यवाहीच्या सूचना संबंधितांना द्याव्यात.

तालुका स्तरावरील समितीने मागच्या महिन्यात केलेल्या कामाचा अहवाल जिल्हाधिकारी यांचेकडे 10 तारखेच्या आत सादर करावा. जिल्हाधिकारी जिल्हास्तरीय समितीचा व जिल्हा अंतर्गत सर्व तालुका स्तरावरील समित्यांचा अहवाल एकत्र करुन 15 तारखेपर्यंत महसूल आयुक्तांना सादर करतील. महसूल आयुक्त आपले अहवाल व आपल्या विभागीय जिल्ह्यांचे अहवाल एकत्रितपणे सचिव/प्रधान सचिव (सेवा) यांचेकडे महिन्याच्या 20 तारखेपर्यंत पाठवतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

रा. द. कासार,
शासनाचे उप सचिव.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
मुख्य सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव,
सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्र्यांचे स्वीय सहाय्यक,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
शासनाचे सर्व सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग (त्यांना विनंती की, या परिपत्रकातील सूचना त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास आणाव्यात.)
सर्व विभागीय आयुक्त/पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,/पोलीस महानिरीक्षक व संचालक एसीबी महाराष्ट्र राज्य, मुंबई/सर्व पोलीस उप महानिरीक्षक/सर्व पोलीस आयुक्त/सर्व मुख्य अभियंता, पाटबंधारे विभाग व सार्वजनिक बांधकाम विभाग/सर्व अधीक्षक कृषि अधिकारी/सर्व मुख्य वन संरक्षक/सर्व सहनिबंधक, सहकारी संस्था/सर्व उपायुक्त (महसूल),
सर्व जिल्हाधिकारी (त्यांना विनंती की, या परिपत्रकात नमूद केल्यानुसार तालुका स्तरावर भ्रष्टाचार निर्मूलन समित्या नेमण्याबाबत त्यांच्या अधिपत्याखालील तहसिलांचे प्रभारी सहाय्यक/उप जिल्हाधिकारी यांना तात्काळ सूचना द्याव्यात.)
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी/सर्व पोलीस अधीक्षक,
सर्व अधीक्षक/कार्यकारी अभियंता, पाटबंधारे विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग/सर्व विभागीय मृद संधारण अधिकारी/सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था/सर्व निवासी उप जिल्हाधिकारी/सर्व तहसिलांचे प्रभारी सहाय्यक किंवा उप जिल्हाधिकारी,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
निवड नस्ती.

-------

* पत्राने.

-----

एच-1033(5000-12-96)